“हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करणेबाबत.”

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : हातमाग-२०२२/प्र.क्र.२२५/टेक्स-३**
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०२३.

**वाचा :**

१) शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र.सीटीएस-१०७२/३७९५/सी २ (१), दि.०५.१०.१९७२
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२००८/ प्र.क्र.९७ /टेक्स-३, दि.२९.०९.२००८
३) शासन निर्णय , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०१५/ प्र.क्र.१४७/टेक्स-३, दि.१७.१०. २०१६ व शासन शुध्दीपत्रक, दि.१८.०१.२०१७
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा. प्रशा-५ दिनांक १० मे, २०१६.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४ एप्रिल, २०२२
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६ मार्च २०२३
७) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. जा.क्र.कार्या-५(२)/हातमाग/विभा.कापड स्पर्धा/६६८१/२०२२, दि. ७ डिसेंबर २०२२

**प्रस्तावना:-**

राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देण्याकरिता व विणकरांनी उत्पादित केलेल्या उत्कृष्ट वाणाला वाव मिळावा या दृष्टिकोनातून महाराष्ट्र शासनाकडून सन १९७२-७३ पासून राज्यातील हातमाग विणकराद्वारे उत्पादित कापडाचे उत्कृष्ट नमुन्यासाठी हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजना राबविण्यात येत आहे. दि.१७.१०.२०१६ रोजीच्या वस्त्रोद्योग विभागाच्या शासन निर्णयाद्वारे सदर योजनेची पुनर्रचना करण्यात आली असून बक्षिसाच्या रकमेतही वाढ करण्यात आलेली आहे व त्याचा वार्षिक आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. सन २०२२-२३ मध्ये बक्षिस योजना राबविण्याकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीतून निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव वस्त्रोद्योग संचालनालयाच्या वर नमूद दि.०७.१२.२०२२ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. "मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरिता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१०११९) ०५ बक्षिसे" या लेखाशिर्षाखाली रू.३,१५,०००/- (अक्षरी- रू. तीन लाख पंधरा हजार फक्त) इतकी रक्कम सन २०२२-२३ साठी मंजूर निधीतून वितरीत करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रू.३.१५ लाख इतका निधी विणकरांच्या स्पर्धेच्या आयोजनासाठी व बक्षिस वितरणासाठी वितरीत करण्यासाठी सहायक संचालक (लेखा), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना या योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात येत आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६ मार्च २०२३ मधील परिच्छेद क्र.३ (अ) व (ब) नुसार सुधारित अंदाजाच्या मर्यादेत अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतुदींसाठी निधी उपलब्ध राहील.

५. हातमाग उद्योगाच्या विकासाकरिता सूट व इतर अर्थसहाय्य, ०५ बक्षिसे या योजनेखाली सन २०२२-२३ साठी रू.४.५० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६ मार्च २०२३ अन्वये कार्यक्रमाखालील खर्चाची बाब सुधारित अंदाजाच्या मर्यादेत विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार रू.३.१५ लाख इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून त्यापैकी अद्यापपर्यंत कोणताही खर्च झालेला नाही.

६ या योजनेच्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
७. वैयक्तिक लाभार्थ्याची देयके आहरित करताना लाभार्थ्यांची यादी निश्चित करून योग्य त्या तपशीलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येवू नयेत. शक्यतो अशा लाभार्थ्यांचे आधार क्रमांक सुध्दा नमूद करावे.

८. स्पर्धेअंती विजेत्या हातमाग विणकरांना द्यावयाची बक्षिसे तसेच आयोजनाकरिता करण्यात येणाऱ्या खर्चाची देयके संबंधितांच्या बँक खात्यात ECS द्वारे थेम जमा करण्यात यावी.
९. या योजनेचा निधी खर्च करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच यासंबंधी शासनाच्या मार्गदर्शक सुचना व नियमांचे पालन कटाक्षाने करावे.

१०. यावरील खर्च "मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्री ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरिता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१०११९) ०५ बक्षिसे" या लेखाशिर्षाखाली सन

२०२२-२३ करिता सुधारित अंदाजाद्वारे उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

११. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

१२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग/ अनौ. संदर्भ क्रमांक क्र. १८७/२०२३/व्यय-२, दि.२१.०३.२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२५१३५९०५०२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2023.03.25 14:05:25 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) अवर सचिव १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
११) प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), मुंबई / नागपूर / औरंगाबाद / सोलापूर
१२) निवड नस्ती, कार्यासन/ टेक्स-३.